**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०१४-१५ व सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामधील "भाऊबीज भेट" रक्कम देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.२६९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०१५

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय, क्र. एबावि-२०१३/प्र.क्र.३१३/का.६, दिनांक ०६ डिसेंबर, २०१३
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पुरक २०१५/प्र.क्र.१४०/अर्थ-३, दिनांक ०१/०८/२०१५

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०१४-१५ मधील प्रलंबित असलेली भाऊबीज भेट प्रत्येकी रु.१०००/- प्रमाणे व सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षात प्रत्येकी रु.१०००/- प्रमाणे भाऊबीज भेट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०१४-१५ मधील प्रलंबित असलेली भाऊबीज भेट प्रत्येकी रु.१०००/- प्रमाणे व सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षात प्रत्येकी रु.१०००/- प्रमाणे भाऊबीज भेट देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. नागरी, ग्रामीण व आदिवासी प्रकल्पाअंतर्गत कार्यरत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना भाऊबीज भेट अदा करण्याकरिता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी कार्यरत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील प्रलंबित भाऊबीज भेट माहे सप्टेंबर, २०१५ मध्ये व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील भाऊबीज भेट माहे नोव्हेंबर, २०१५ मध्ये दिवाळीपूर्वी रक्कम अदा केली जाईल याची दक्षता घ्यावी व तशा सूचना सर्व संबंधितांना देण्यात याव्यात.

३.  यासाठी होणारा खर्च :-

**(१) मागणी क्रमांक :- एक्स-१,** २२३६, पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (ग्रामीण १०० टक्के), (०५) एकात्मिक बाल विकास सेवा योजना, (०५) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना, (२२३६ ००६३), (राज्य आरोग्य व पोषण आहार निधीतून भागविलेली रक्कम), ०२ - मजुरी, योजनांतर्गत

**(२) मागणी क्रमांक :- एक्स-१,** २२३६, पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनाअंतर्गत योजना, (०१) (०४) एकात्मिक बाल विकास योजना, (२२३६ ०५४६), (राज्य आरोग्य व पोषण आहार निधीतून भागविलेली रक्कम), ०२ - मजुरी, योजनांतर्गत या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात जुलै, २०१५ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३.  हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.३६४ (१४७२), दिनांक १०/०९/२०१५ अन्वये व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६३९३, व्यय-६, दिनांक १९/०९/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२११२३७४५०८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: CN = Vasave Vijesing F, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Women and Child Department
Reason: I am the author of this document
Date: 2015.09.22 17:18:41 +05'30'

**(वि. फ. वसावे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

७) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
९) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व मंत्रालयीन विभाग
११) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
१२) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
१६) सर्व जिल्हाधिकारी
१७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१९) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१) वित्त विभाग/व्यय-६, मंत्रालय, मुंबई
२२) नियोजन विभाग/का.१४७२, मंत्रालय, मुंबई
२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२५) सहायक संचालक (वित्त व लेखा), एबाविसेयो, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२६) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
२८) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२९) निवड नस्ती (कार्यासन ६)